सन २०१८-१९ करीता राज्यातील तालुका क्रीडा संकुलाकरीता अनुदान वितरणास मान्यता देणेबाबत.

**महाराष्ट्र शासन**
**शालेय शिक्षण व क्रीडा विभाग**
**शासन निर्णय क्रमांकः क्रीडायो-२३१८/प्र.क्र.२६०/क्रीयुसे-१,**
मादाम कामा मार्ग, हुतात्मा राजगुरु चौक,
मंत्रालय विस्तार, मुंबई-४०० ०३२.
दिनांक : १६ जानेवारी, २०१९.

**वाचा :-**

१) शासन निर्णय, सामाजिक न्याय, सांस्कृतिक कार्य, क्रीडा व विशेष सहाय्य विभाग, क्र.राक्रीधो २००३/प्र.क्र.११/क्रीयुसे-१, दिनांक २६ मार्च, २००३.
२) शासन निर्णय, शालेय शिक्षण व क्रीडा विभाग क्र.राक्रीधो २००९/(प्र.क्र.२५/०९)/ क्रीयुसे-१, दिनांक २१ मार्च, २००९.
३) सहाय्यक संचालक, क्रीडा व युवक सेवा, पुणे यांचे पत्र क्र.ताक्रीसं/निमा/निवि/१८-१९/४८/ का-९/५१५७, दिनांक २३ नोव्हेंबर, २०१८.

**प्रस्तावना :-**

राज्याचे क्रीडा धोरण २००१ अंतर्गत तालुका स्तरावर तालुका क्रीडा संकुल यामध्ये विविध खेळाच्या किमान सुविधा उपलब्ध करुन देणे, जिल्हा स्तरावर जिल्हा क्रीडा संकुलांतर्गत राष्ट्रीय दर्जाच्या क्रीडा सुविधा उपलब्ध करुन देणे, त्याचप्रमाणे विभागीय स्तरावर विभागीय क्रीडा संकुलांतर्गत आंतरराष्ट्रीय दर्जाच्या क्रीडा सुविधा उभारण्याची योजना दिनांक २६ मार्च, २००३ च्या शासन निर्णयान्वये कार्यान्वित करण्यात आली आहे. दिनांक २१ मार्च, २००९ च्या शासन निर्णयानुसार तालुका क्रीडा संकुलाची अनुदान मर्यादा रु.२५.०० लक्षवरुन रु.१.०० कोटी, जिल्हा क्रीडा संकुलाची अनुदान मर्यादा रु.४.०० कोटीवरुन रु.८.०० कोटी व विभागीय क्रीडा संकुलाची अनुदान मर्यादा रु.१६.०० कोटीवरुन रु.२४.०० कोटी एवढी करण्यात आली आहे.

२. दिनांक २६.०३.२००३ च्या शासन निर्णयान्वये राज्य क्रीडा विकास समितीची स्थापना करण्यात आली आहे. सदर समितीस विभागीय/जिल्हा/तालुका क्रीडा संकुलातील विविध क्रीडा सुविधांसाठी तांत्रिक, प्रशासकीय व वित्तीय मान्यता देण्याचे अधिकार आहेत. सदर राज्य क्रीडा विकास समितीच्या दिनांक ०२.११.२०१८ रोजी झालेल्या बैठकीत २४ तालुका क्रीडा संकुलांना शासन देय अनुदान वितरित करण्यास मान्यता देण्यात आली आहे. त्यानुसार क्रीडा व युवक संचालनालयाच्या संदर्भाधीन क्र.३ च्या पत्रान्वये संबंधित तालुका क्रीडा संकुलांसाठी रु.११४८.३३ लक्ष इतकी तरतूद वितरीत करण्याची विनंती करण्यात आली आहे. त्याप्रमाणे तालुका क्रीडा संकुलांसाठी सन २०१८-१९ या आर्थिक वर्षामध्ये

अर्थसंकल्पित करण्यात आलेली तरतूद वितरीत करण्यास मान्यता देण्याची बाब शासनाच्या विचाराधीन होती.

**शासन निर्णय:-**

क्रीडा प्रशिक्षण केंद्राची आस्थापना या कार्यक्रमांतर्गत योजनेकरीता सन २०१८-१९ या वर्षाकरिता अर्थसंकल्पीत केलेल्या तरतूदीपैकी रु.११४८.३३ लक्ष (रुपये अकरा कोटी अठ्ठेचाळीस लाख तेहतीस हजार फक्त) इतकी तरतूद २४ तालुका क्रीडा संकुलांच्या बांधकामाकरिता सोबतच्या परिशिष्ट "अ" मध्ये दर्शविल्यानुसार वितरीत करण्यास व आयुक्त, क्रीडा व युवक सेवा, महाराष्ट्र राज्य, पुणे यांच्या अधिनस्त ठेवण्यास शासन या आदेशाद्वारे मान्यता देत आहे. सदरचा निधी ज्या प्रयोजनाकरिता / बाबींकरिता मंजूर केला आहे. त्याच बाबींकरिता खर्च करण्यात यावा.

२. सन २०१८-१९ मध्ये क्रीडा प्रशिक्षण केंद्राची आस्थापना याकरीता उपलब्ध झालेल्या रु.३१०२.९१ लक्ष एवढया तरतुदी मधून सदर निधी वितरीत करण्यात यावा.

I. उपरोक्त निधी आवश्यकतेनुसार मान्य निकषानुसार खर्च करण्यात यावा. ज्यावेळेस निधी प्रत्यक्ष खर्च करावयाचा त्याच वेळी आंहरीत करावा. शासन लेख्याबाहेर बँक खात्यात हा निधी ठेऊ नये.

II. राज्य शासनामार्फत वेळोवेळी वित्त विषयक निर्गमित करण्यात आलेले विविध आदेश/नियम/ शासन निर्णय वित्तीय नियमावली यांची अंमलबजावणी करुन वरील वितरीत तरतूदीचा विनियोग करण्याच्या अधीन राहून उपरोक्त तरतूद वितरीत करण्यास मान्यता देण्यात येत आहे.

३. उपरोक्त संदर्भात होणारा खर्च मागणी क्रमांक ई-३, प्रधान लेखाशीर्ष २२०४, क्रीडा व युवक सेवा, १०४, क्रीडा व खेळ, (१०) (०२) क्रीडा प्रशिक्षण केंद्राची आस्थापना, (२२०४ १७९२), ३१, सहाय्यक अनुदाने (वेतनेतर) या लेखाशीर्षाखालील या वर्षाच्या उपलब्ध तरतूदीतून करण्यात यावा.

४. वित्त विभाग दिनांक ०२.०४.२०१८ च्या परिपत्रकातील सूचनानुसार उपरोक्त तरतुद खर्च करण्याबाबतची कार्यवाही करण्यात यावी. यासाठी संबंधित जिल्हा क्रीडा अधिकारी यांना आहंरण व संवितरण अधिकारी तर आयुक्त, क्रीडा व युवक सेवा यांना नियंत्रण अधिकारी म्हणून घोषित करण्यात येत आहे.

५. सदरचा शासन निर्णय वित्त विभागाच्या दिनांक ०२.०४.२०१८ च्या परिपत्रकातील सूचनांना अनुसरुन निर्गमित करण्यात येत आहे. सदर परिपत्रकाच्या परिशिष्टातील अनुक्रमांक ८ मध्ये नमूद

अटींची पूर्तता होत आहे. सदर परिपत्रकाच्या परिशिष्टातील मुद्दा क्र.१, २, ३, ४, ५, ६ व ७ मधील बाबी सदर आदेशास लागू नाहीत.

६. सदर शासन निर्णय महाराष्ट्र शासनाच्या www.maharashtra.gov.in या संकेतस्थळावर उपलब्ध करण्यात आला असून त्याचा संकेताक २०१९०११७१५५४५५५०२१ असा आहे. हा आदेश डिजीटल स्वाक्षरीने साक्षांकित करुन काढण्यात येत आहे.

महाराष्ट्राचे राज्यपाल यांच्या आदेशानुसार व नावाने.

Rajendra Shankarrao Pawar

Digitally signed by Rajendra Shankarrao Pawar
DN: CN = Rajendra Shankarrao Pawar, C = IN, S = Maharashtra, O = Government Of Maharashtra, OU = School Education and Sports Department
Date: 2019.01.17 16:00:25 +05'30'

**( राजेंद्र पवार )**
उप सचिव, महाराष्ट्र शासन

प्रत,

१. मा.राज्यपाल, महाराष्ट्र राज्य यांचे स्वीय सहायक, मुंबई.
२. मा.मंत्री, शालेय शिक्षण व क्रीडा विभाग यांचे स्वीय सहायक, मंत्रालय, मुंबई.
३. मा.विरोधी पक्षनेता (विधानसभा / विधानपरिषद) यांचे स्वीय सहायक, मुंबई.
४. सर्व विधानसभा / विधानपरिषद सदस्य यांचे स्वीय सहायक.
५. अपर मुख्य सचिव, शालेय शिक्षण व क्रीडा विभाग, मंत्रालय, मुंबई-४०० ०३२,
६. आयुक्त, क्रीडा व युवक सेवा, महाराष्ट्र राज्य, पुणे,
७. सर्व जिल्हाधिकारी (क्रीडा संचालनालयामार्फत)
८. सर्व उपसंचालक, क्रीडा व युवक सेवा (क्रीडा संचालनालयामार्फत)
९. महालेखापाल (लेखा अनुज्ञेयता), महाराष्ट्र-१ - मुंबई/महाराष्ट्र-२ नागपूर,
१०.महालेखापाल (लेखा), महाराष्ट्र-१ - मुंबई/महाराष्ट्र-२ नागपूर
११.अधिदान व लेखाधिकारी, मुंबई. (क्रीडा संचालनालयामार्फत)
१२.सर्व संबंधित जिल्हा कोषागार अधिकारी ( क्रीडा संचालनालयामार्फत)
१३.वरिष्ठ कोषागार अधिकारी, पुणे. ( क्रीडा संचालनालयामार्फत)
१४.सर्व जिल्हा क्रीडा अधिकारी ( क्रीडा संचालनालयामार्फत)
१५.वित्त विभाग (व्यय-५)/अर्थ-८/नियोजन विभाग (का.१४७१), मंत्रालय, मुंबई,
१६.कार्यासन अर्थसंकल्प, शालेय शिक्षण व क्रीडा विभाग, मंत्रालय, मुंबई,
१७.निवड नस्ती (क्रीयुसे-१)

**परिशिष्ट-अ**

**शासन निर्णय, शालेय शिक्षण व क्रीडा विभाग क्र.क्रीडायो-२३१८/प्र.क्र.२६०/क्रीयुसे-१, दिनांक १६ जानेवारी, २०१९ चे जोडपत्र**

| अ.क्र. | जिल्हा | अ.क्र. | तालुका क्रीडा संकुल | निधी वितरण (रु.लाखात) |
|---|---|---|---|---|
| १ | ठाणे | १ | उल्हासनगर | ७६.३४ |
| २ | जळगांव | २ | चोपडा | ७६.३४ |
| | | ३ | यावल | २४.६४ |
| ३ | नंदुरबार | ४ | अक्कलकुवा | ७६.२८ |
| ४ | सिंधुदुर्ग | ५ | कुडाळ | ७६.३४ |
| | | ६ | दौडामार्ग | २४.६४ |
| ५ | औरंगाबाद | ७ | सिल्लेड | २४.६४ |
| ६ | जालना | ८ | परतूर | ७०.०० |
| ७ | बीड | ९ | बीड | ७५.०० |
| ८ | लातूर | १० | अहमदपूर | ६६.३४ |
| | | ११ | शिरुर - अनंतपाळ | १६.३४ |
| ९ | हिंगोली | १२ | हिंगोली | ७६.३४ |
| १० | नांदेड | १३ | बिलोली | ७६.३४ |
| | | १४ | उमरी | १०.०० |
| ११ | नागपूर | १५ | नागपूर ग्रामीण | ७६.३४ |
| १२ | अमरावती | १६ | अमरावती | ७६.३४ |
| | | १७ | चिखलदरा | २४.६४ |
| १३ | गडचिरोली | १८ | एटापल्ली | ७६.३४ |
| | | १९ | भामरागड | २४.६५ |
| | | २० | चार्मोशी | २४.६५ |
| १४ | यवतमाळ | २१ | दिग्रस | २४.६५ |
| १५ | अकोला | २२ | बाळापूर | २४.६४ |
| १६ | कोल्हापूर | २३ | आजरा | १२.७२ |
| | | २४ | हातकणंगले हुपरी | १३.७८ |
| | | | **एकुण** | **११४८.३३** |

**(एकूण रूपये अकरा कोटी अठ्ठेचाळीस लाख तेहतीस हजार फक्त)**

Rajendra Shankarrao Pawar

Digitally signed by Rajendra Shankarrao Pawar
DN: CN = Rajendra Shankarrao Pawar, C = IN, S = Maharashtra, O = Government Of Maharashtra, OU = School Education and Sports Department
Date: 2019.01.17 16:00:40 +05'30'

**( राजेंद्र पवार )**
**उप सचिव, महाराष्ट्र शासन**